१ जून,२०२५ रोजी देय झालेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्याची ( ग्रामीण ) परतफेड करण्यासाठी रोख अनुदान (लेखाशीर्ष २२१५ ११७३)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलआयसी-२०२५/प्र.क्र.१६४/पापु-०४**
७ वा मजला, जी.टी. रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक रोड, मंत्रालय, मुंबई-४००००१
दिनांक : २७ मे, २०२५

**वाचा**

१) ग्राम विकास विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: एलआयसी-१०८७/सीआर-५४४/५९, दि. २ मे, १९८९

२) ग्रामविकास विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक: एलआयसी-१०८७/सीआर-५४४/५९, दिनांक १९ ऑक्टोबर,१९८९.

३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल,२०२५

**प्रस्तावना**

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून जिल्हा परिषदांना मंजूर झालेल्या कर्जाच्या दिनांक ०१ जून,२०२५ रोजी परतफेडीसाठी देय असलेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्यापोटी,मुद्दल व व्याज असे एकूण रक्कम रु. ५,५८,१७,४८०/- (रु. पाच कोटी, अठ्ठावन्न लाख, सतरा हजार, चारशे ऐंशी फक्त) भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे भरणा करण्याकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करावयाचे आहेत.

२. उपरोक्त प्रयोजनासाठी २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये रुपये रु. ७,००,००,०००/- (सात लाख फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध आहे. सदर तरतुदीतून दिनांक ०१.०६.२०२५ रोजी देय झालेल्या मुद्दल रु. ४,६४,६२,९६०/- आणि रु. ९३,५४,५२०/- व्याज अशी एकुण रक्कम रु. ५,५८,१७,४८०/- इतकी रक्कम विहित कालावधीत अदा करण्याकरीता, सदर रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय महामंडळाकडून जिल्हा परिषदांना मंजूर झालेल्या कर्जाच्या दिनांक ०१ जून,२०२५ रोजी परतफेडीसाठी देय असलेल्या भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाचे हप्त्यापोटीची, मुद्दल आणि व्याज अशी एकूण रक्कम रु. ५,५८,१७,४८०/- (रु. पाच कोटी, अठ्ठावन्न लाख, सतरा हजार, चारशे ऐंशी फक्त ) इतकी रक्कम सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. हे अनुदान कोषागारातून प्राप्त करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या श्री. सीताराम काळे, संचालक (वित्त) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व श्री. राजेंद्र गेंगजे, उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांस सादर करावे.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान एकूण रक्कम **रु. ५,५८,१७,४८०/- (रु. पाच कोटी, अठ्ठावन्न लाख, सतरा हजार, चारशे ऐंशी फक्त )** चा खर्च पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग- मागणी क्र. वाय-२-लेखाशीर्ष “२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता -०१-पाणी पुरवठा-१०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०१) स्थानिक क्षेत्र-(०१) स्थानिक क्षेत्र-(०१) (०१) ग्रामीण पिण्याचे पाणी पुरवठा योजनांकरिता आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाच्या देय रकमांच्या परतफेडीबाबतचा खर्च भागविण्यासाठी जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ ११७३) ३१, सहाय्यक अनुदाने” (वेतनतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा आणि त्या खाली २०२५-२०२६ वर्षाकरिता उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीतून हा खर्च भागवावा.

४. सदर सहायक अनुदान वेतनेतर असल्याने वित्त विभागाच्या दि.१२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार ते “सशर्त” स्वरूपाचे आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४४२/२०२५,दि. १९/०५/२०२४ अन्वये सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२७१७५३२७५२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NIWRUTTI DHAS

Digitally signed by ANIL NIWRUTTI DHAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F85F1C64C05886C8D514E40D54D27FF3A80FFD907A05433B1C412B7F7FFA0AFD, cn=ANIL NIWRUTTI DHAS
Date: 2025.05.27 18:07:31 +05'30'

**(अनिल धस)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टावर्स, ४ था मजला, मुंबई-४०००२१.
२) मुख्याधिकारी, नगरपरिषदा व नगरपंचायती ( सर्व ).
३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
४) अधिक्षक अभियंता, (सीपीडीएम ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , सिडको भवन, नवी मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर ( लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ).
६) निवासी लेखाधिकारी, मुंबई -४०००२१.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.
९) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती / नागपूर.
१०) वित्त विभाग, ( व्यय -३/ अर्थोपाय )मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. पापु-२०.
१२) निवडनस्ती ( का.क्र. पापु-०४ ),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.